**राज्यातील वीज उपलब्ध असलेल्या शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्याची पोती शिवण्यासाठी शिवण यंत्रे, त्याच्या सुट्याभागांचा संच आणि हँगींग हूक गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलद्वारे खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सामुग्री-३१२१/ प्र.क्र.१३१/ ना.पु. १६ अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०३ फेब्रुवारी , २०२२.

<u>संदर्भ</u> : (१) उद्योग उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-६, दि. ०१ डिसेंबर, २०१६
(२) उद्योग उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दि. २४ ऑगस्ट, २०१७
(३) शासन निर्णय क्र. सामुग्री-३१२१/प्र.क्र.१०४/नापु-१६ अ, दि.०७ ऑक्टोबर ,२०२१
(४) शासन निर्णय क्र. सामुग्री-३११६/प्र.क्र.१७१/नापु-१६ अ, दि.१६ जानेवारी, २०१८

**<u>प्रस्तावना :-</u>**

राज्यातील वीज उपलब्ध असलेल्या शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्याच्या पोत्यांचे प्रमाणिकरण केल्यानंतर ती शिवण्यासाठी पोती शिवण यंत्रांचा तर वीज उपलब्ध नसलेल्या शासकीय धान्य गोदामांमध्ये सुतळी गाठींचा वापर करण्यात येतो.

केंद्र शासनाने राष्ट्रीय खरेदी धोरणांतर्गत खरेदी प्रक्रियेत मोठया प्रमाणात बदल केले आहेत. शासकीय विभाग/संस्थांकडून वस्तु व सेवांच्या खरेदीसाठी केंद्र शासनाने गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) हे पोर्टल विकसित केलेले आहे. सदर पोर्टलची कार्यपध्दती, राज्य शासनास वस्तु व सेवा खरेदी करण्यासाठी स्विकृत करण्यास उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या वाचा क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. त्यानुसार गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलवर खरेदीसाठी उपलब्ध असलेल्या वस्तू व सेवांचे दोन किंवा त्यापेक्षा जास्त पुरवठादार असतील तर सदरच्या वस्तू व सेवांची गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलवर खरेदी करण्यास, खरेदी धोरण दि.०१/१२/२०१६ मधील परिच्छेद २.४ मध्ये नमुद केलेल्या लक्ष्यांकित विभागांना/कार्यालयांना बंधनकारक करण्यात आले आहे. तसेच त्यानुषंगाने खरेदी प्रक्रियेबाबतच्या संदर्भ क्र.१ येथील दि. १ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयात आवश्यक ते बदल केले आहेत.

त्यानुसार विभागाने संदर्भ क्र.४ अन्वये वीज उपलब्ध असलेल्या ५०० शासकीय गोदामांसाठी ११०० शिवणयंत्रे त्यांच्या सुट्या भागाचा संच, हँगिंग हूक व शिवणयंत्रासाठी लागणारा धागा गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलद्वारे खरेदी करुन क्षेत्रिय कार्यालयांना पुरविला आहे.

ज्या शासकीय धान्य गोदामांमध्ये वीज उपलब्ध असताना पुरेशी पोती शिवणयंत्रे उपलब्ध करून दिली गेली नाहीत. तसेच ज्या शासकीय धान्य गोदामांमध्ये नव्याने वीज उपलब्ध झालेली आहे, अशा शासकीय गोदामांमध्ये राज्यातील काही जिल्ह्यांनी केलेल्या मागणीनुसार पोती शिवणयंत्रे, त्याच्या सुट्याभागांचा संच, हँगींग हुकसह उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

राज्यातील वीज उपलब्ध असलेल्या/झालेल्या शासकीय धान्य गोदामांमधील अन्नधान्याच्या पोत्यांचे प्रमाणिकरण केल्यानंतर ती शिवण्यासाठी सहज हाताळता येतील अशी ४४५ पोती शिवणयंत्रे (Bag Closer Machines) (एक वर्षाच्या वॉरंटीसह ), त्याच्या सुट्याभागांचा संच (Spare Parts) व हँगींग हूक (Hanging Hook) यांची खरेदी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या केंद्र शासनाच्या पोर्टलवर BOQ पध्दतीने स्पर्धात्मक ऑनलाईन निविदा प्रक्रियेद्वारे करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवर एका पोती शिवणयंत्राची हँगींग हुकसह आणि एक वर्षाच्या हमीसह किंमत रु.१३,४५०/- इतकी आहे. त्यानुसार ४४५ पोती शिवणयंत्रे हँगींग हुक आणि एक वर्षाच्या हमीसह खरेदी करण्यासाठी होणाऱ्या अंदाजे एकूण रु.५९,८५,२५०/- (अक्षरी-एकोणसाठ लाख पंच्याऐंशी हजार दोनशे पन्नास फक्त ) इतक्या खर्चास या आदेशाद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

उपरोक्त ४४५ पोती शिवणयंत्रांच्या खरेदीनंतर १ वर्षाच्या हमी कालावधीनंतरच्या पुढील एक वर्षाच्या देखभाल दुरुस्ती खर्चासाठी येणाऱ्या अंदाजे रू.६६,७५,०००/- (अक्षरी रूपये सहासष्ठ लाख पंच्याहत्तर हजार फक्त) इतक्या खर्चास या आदेशाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**(१) गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलद्वारे खरेदी प्रक्रिया राबविण्याची जबाबदारी:-**

१.१ सदर प्रणालीचा वापर करण्यासाठी खालील नमूद अधिकाऱ्यांना जबाबदार प्राधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवरील मार्गदर्शक सूचनांनुसार सर्व बाबींची पुर्तता करणे बंधनकारक आहे.

| अ.क्र. | Role in GeM Portal | Responsibility in GeM Portal | प्राधिकाराऱ्याचे नाव व कार्यालय |
|---|---|---|---|
| १. | Primary User | GeM Portal द्वारे होत असलेल्या संपुर्ण खरेदी प्रक्रियेचे संनियंत्रण ठेवणे. Secondary User (Buyer) व (Consignee) यांची नोंदणी GeM Portal वर करणे. | वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग |

| | | | |
|---|---|---|---|
| २. | Secondary User (Buyer) | विभागाच्या वतीने पोती शिवणयंत्रे (Bag Closer Machine) त्याच्या सुट्या भागांचा संच व हँगिंग हूकसह, खरेदी करण्याची कार्यवाही करणे. | सह सचिव (नापु.१६-अ)<br>अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग. |
| ३. | Secondary User (Consignee) | GeM Portal वरुन खरेदी केलेला माल स्विकृत करणे व त्याची पोहोच देणे. | सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी व अन्नधान्य वितरण अधिकारी |
| ४. | P.A.O./D.D.O. | GeM वरुन खरेदी केलेल्या सामुग्रीची देयके नियमांनुसार १० दिवसांच्या आत प्रदान करणे | लेखाधिकारी, वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय. |

१.२ गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवर BOQ पध्दतीने शिवणयंत्रे, त्यांच्या सुट्या भागांचा संच व हँगींग हुक यांचा एकत्रित संच उपलब्ध असल्याने ४४५ पोती शिवणयंत्रांची खरेदी सुट्याभागांचा संच हँगींग हुकसह (एक वर्षाच्या हमीसह) आणि पुढील १ वर्षाच्या देखभाल दुरूस्ती खर्चासह ऑनलाईन निविदा प्रक्रियेद्वारे करण्यात यावी.

१.३ खरेदी करण्यात आलेली सामुग्री ही संबंधित जिल्ह्याच्या ठिकाणी जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्या कार्यालयात पोहोच करणे आवश्यक असल्याचे निविदेमध्ये स्पष्ट करावे. त्यासाठी वस्तु पोहोच करावयाच्या ठिकाणांची संख्येसह यादी **परिशिष्ट "अ"** मध्ये दिली आहे. ही यादी निविदेसह गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवर उपलब्ध करुन दयावी.

**(२) खरेदी करावयाच्या सामुग्रीची मानके (Specifications):**

पोती शिवणयंत्रे व त्यांच्या सुट्याभागांचा संच, हँगींग हूक यासाठीची मानके (Specifications) या शासन निर्णयासोबतच्या **परिशिष्ट "ब"** मध्ये नमूद केली आहेत. या मानकांनुसार खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी. उपरोक्त प्रक्रियेत भाग घेणाऱ्या पुरवठादारास सदर मानकानुसार (Specifications) वस्तुंचा पुरवठा करणे बंधनकारक राहील.

**(३) खरेदी प्रक्रिया :**

३.१ गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवर उपरोक्त मानकांची पुर्तता करणारे शिवण यंत्रे, हँगींग हुकचे जे पुरवठादार आहेत व त्यांची सरासरी वार्षिक उलाढाल ही किमान २५ लाख रुपये आहे, अशा पुरवठादारांकडून बोली मागविण्यासाठी GeM portal वर ई-निविदा प्रसिध्द करावी. निविदाकारांकडून ई-निविदा (E-Bid) प्राप्त झाल्यावर सहभागी झालेल्या निविदाकारांकडून त्यांना उत्पादक कंपनीचा अधिकृत वितरक असल्याबाबतचे प्राधिकारपत्र, निविदेसह सादर करावे. वार्षिक उलाढाल दर्शविणाऱ्या प्रमाणपत्राचे प्रारुप "**परिशिष्ट-क**" मध्ये कृपया पहावे.

**(४) इसाऱ्याची रक्कम :-**

४.१ खरेदीच्या प्रकारानुसार इसारा रक्कम पुढील प्रमाणे असेल-

(रुपये)

| अ.क्र. | निविदेचा प्रकार | खरेदीची (निविदेची) एकूण किंमत | इसारा रक्कम |
|---|---|---|---|
| १ | ४४५ पोती शिवण यंत्रे, त्यांच्या सुट्या भागांचा संच हँगीग हूकसह (एक वर्षाच्या हमीसह) तसेच एक वर्षाच्या हमी कालावधीनंतर येणाऱ्या वार्षीक देखभाल दुरुस्ती खर्चासह | रु.५९,८५,२५०/- + रू.६६,७५,०००/- एकूण रू. **१,२६,६०,२५०/-** | खरेदी किमतीच्या २ टक्के |

४.२ इसाऱ्याची रक्कम गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) कार्यप्रणालीमध्ये विहित केल्यानुसार जमा करावी.

४.३ ज्यांनी इसारा रक्कम भरलेली असेल, त्यांना ऑनलाईन खरेदी प्रक्रियेमध्ये भाग घेणे बंधनकारक आहे, खरेदी प्रक्रियेमध्ये भाग न घेतल्यास त्यांची इसाऱ्याची संपूर्ण रक्कम जप्त करण्यात यावी.

४.४ विनिर्दिष्टीत केलेल्या इसारा रक्कमेपेक्षा कमी रक्कम भरणाऱ्या पुरवठादारास अपात्र ठरवून भरलेली संपूर्ण रक्कम जप्त करण्यात यावी.

४.५ गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलद्वारे पुरवठादार निश्चित झाल्यावर न्यूनतम पुरवठादारा व्यतिरिक्त उर्वरित सर्व पुरवठादारांची इसारा रक्कम सात दिवसात परत करण्यात यावी.

४.६ इसारा रकमेवर कुठल्याही प्रकारे व्याज देय राहणार नाही.

४.७ इसारा रक्कम दोन महिन्याच्या आत परत न केल्यास झालेल्या विलंबावर १० टक्के व्याज प्रदेय राहिल व व्याजाची पूर्ण रक्कम विलंबास जबाबदार असणाऱ्या संबंधित अधिकारी / कर्मचारी यांचेकडून वसूल करण्यात यावी.

४८. शासकीय मंडळ /महामंडळ/उपक्रमांना तसेच सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांतर्गत वरील वस्तुंसाठी नोंदणीकृत असलेल्या उत्पादक व पुरवठादार यांना निविदेमध्ये निविदा शुल्क व बयाना रक्कम भरण्यापासुन सुट देण्यात यावी. यामध्ये महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ / महासंघ हे वगळता इतर नोंदणीकृत पुरवठादारांना उत्पादकाकडून अधिकृत विक्रेता असल्याचे प्राधिकार पत्र सादर करणे आवश्यक राहील. अथवा गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवरील तरतूदीनुसार कार्यवाही करावी.

**(५) अनामत रक्कम** (Security Deposit):-

५.१ पुरवठादारास उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि.१डिसेंबर,२०१६ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.४.६ मधील तरतूदीनुसार खरेदी मुल्याच्या

किंमतीवर ३% अनामत रक्कम करारनाम्यासोबत धनाकर्षाद्वारे वित्तीय सल्लागार व उपसचिव यांचे नावे जमा करावी लागेल.

५.२ अनामत रकमेवर कोणतेही व्याज देय राहणार नाही. तसेच, पुरवठादाराने करारातील कोणत्याही अटीचा भंग केल्यास अनामत रक्कम जप्त करण्यात येईल व त्याचे नाव काळ्या यादीत टाकण्यात येईल.

५.३ पोती शिवणयंत्रे, त्यांच्या सुट्याभागांचा संच व हँगींग हुकसह खरेदीबाबत घेतलेली अनामत रक्कम वॉरंटी कालावधी संपेपर्यंत परत करण्यात येऊ नये. वॉरंटी कालावधीत पुरवठादाराविरुध्द कोणतीही तक्रार आली नाही तर इंडेम्निटी बॉंड घेऊन अनामत रक्कम परत करण्यात यावी.

**(६) पुरवठा कालावधी :**

यशस्वी पुरवठादारास ९० दिवसाच्या कालावधीत या वस्तुंचा पुरवठा संबंधित जिल्हा पुरवठा कार्यालयात स्वत:च्या खर्चाने करावयाचा आहे.

**(७) पुरवठादाराची जबाबदारी:-**

७.१ जर पुरवठादार हा उत्पादक कंपनीचा अधिकृत वितरक असेल तर, त्यास सदर प्रक्रियेत त्याबाबतचे प्राधिकारपत्र सादर करावे लागेल.

७.२ पुरवठादारास वाचा क्र.१ येथील शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ३.१.१.२ नुसार चिन्हांकित नसलेल्या उत्पादनांचा दर्जा तपासण्यासाठी उपरोक्त शासन निर्णयाच्या परिशिष्ठ १२ मध्ये देण्यात आलेल्या यादीतील प्रयोगशाळांकडून शिवणयंत्रे व हँगींग हुक यांची तपासणी करुन घेऊन गुणनियंत्रण प्रमाणपत्र गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवर Upload करणे बंधनकारक आहे. तसेच प्रयोगशाळेकडून गुणनियंत्रण करुन घेतलेली वस्तु नमुन्यादाखल सह सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांच्या कार्यालयात सादर करावी लागेल. त्यानंतरच पुरवठादाराचा या प्रक्रियेतील भाग ग्राह्य धरण्यात येईल.

७.३ पोती शिवणयंत्रे, त्यांच्या सुट्या भागांचा संच या प्रकारच्या यशस्वी पुरवठादारास शिवण यंत्रासाठी १२ महिन्याच्या वॉरंटी बंधन कारक असून उपरोक्त कालावधीत मशिनची देखभाल दुरुस्ती करणे त्यांच्यावर बंधनकारक आहे. या सर्व बाबींचा विचार करुन त्यांनी निविदेमध्ये सहभागी व्हावे.

७.४ पोती शिवणयंत्र, त्यांच्या सुट्या भागांचा संच व हँगींग हूक वाहतूकीदरम्यान खराब (Damage) झाल्यास त्यास पुरवठादार स्वत: जबाबदार राहील. सदरच्या वस्तु बदलून न दिल्यास त्याची रक्कम अदा करावयाच्या देयकातून कपात करुन घेण्यात येईल.

७.५ **परिशिष्ट "ब"** मध्ये दर्शविलेल्या मानकांप्रमाणे (Specifications) शिवणयंत्रासोबत त्याचे सुट्टेभाग (विहित केलेल्या संख्येनुसार) त्याचप्रमाणे इतर आवश्यक साहित्य (Standard accessories) देणे बंधनकारक आहे.

७.६ जिल्हा पुरवठा कार्यालयाच्या ठिकाणी शिवणयंत्राचा पुरवठा केल्यानंतर पुरवठादाराने जिल्ह्याच्या ठिकाणी शिवणयंत्राचे प्रात्याक्षिक आयोजित करणे बंधनकारक राहिल. यामध्ये शिवणयंत्राची देखभाल दुरुस्ती, छोटे मोठे दोष निवारण, काही कालावधीनंतर जे सुटे भाग बदलावे लागतात, ते बदलण्याचे प्रात्याक्षिक इ. माहिती शिवणयंत्रे वापरणाऱ्या हमाल कामगारांना देण्यात यावी.

७.७ पुरवठादाराने डिलीव्हरी दिल्यानंतर, डिलीव्हरी चलनावर शिवणयंत्र व त्याच्या सुट्याभागांचा संच, हँगींग हुक, ताब्यात घेणाऱ्या गोदामपाल/ गोदाम व्यवस्थापक यांच्या सही शिक्क्यानंतर डिलीव्हरी चलनावर जिल्हा पुरवठा अधिकारी/ सहाय्यक जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी प्रती स्वाक्षरी करुन शिक्का मारावा. संबंधित गोदामपाल / गोदाम व्यवस्थापक यांनी उत्पादकाचे चिन्हांकन, उत्पादन दिनांक, दर्जा योग्य असल्याबाबत खातरजमा करुन "**परिशिष्ट-ड**" मध्ये विहित केल्यानुसार प्रमाणपत्र द्यावे.

७.८ उपरोक्त ७.७ प्रमाणे कार्यवाही केल्यानंतर जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवर वस्तु प्राप्त झाल्याबाबतची आवश्यक ती नोंद करावी. त्यानंतर देयक प्रदानासाठीची गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलवरील मुदत विचारात घेऊन, लेखाधिकारी, वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय यांनी देयके अदा करावीत.

## (८) जिल्हा पुरवठा कार्यालयाची जबाबदारी:

८.१ जिल्ह्यासाठी प्राप्त झालेल्या पोती शिवण यंत्रांचे वाटप वीज उपलब्ध असलेल्या शासकीय गोदामांना करताना, जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी त्या गोदाम इमारतीची नियतन क्षमता विचारात घेऊन प्रत्येक गोदाम इमारतीच्या किमान ते अधिकतम ५०० मे.टन क्षमतेसाठी २ पोती शिवण यंत्रे याप्रमाणे पोती शिवण यंत्रांचे वितरण यापुर्वी वितरीत केलेली पोती शिवण यंत्रे विचारात घेऊन करावे. (उदा १००/२५०/३५०/५०० मे.टन क्षमता असलेल्या गोदाम इमारतीसाठी २ शिवण यंत्रे व गोदाम क्षमता जास्त असल्यास वाढीव ५०० मे.टनच्या पटीतील गोदाम क्षमतेसाठी प्रत्येकी २ शिवण यंत्रे म्हणजेच २५०० मे.टनसाठी १० शिवण यंत्रे याप्रमाणे वितरण करावे.

८.२ पोती शिवण यंत्रांच्या नियमित वापरासाठी या शिवण यंत्रांना सातत्याने वंगणाची गरज लागते. त्याचप्रमाणे शिवण यंत्र तापल्यावर त्याचा वापर थांबवून दुस-या शिवणयंत्राद्वारे काम सुरु करणे आवश्यक आहे या बाबीकडे दुर्लक्ष करून शिवण यंत्रे वापरल्याने ती गरम होतात, बंद पडतात, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. सबब, पुरवठा कार्यालयाने ही बाब कटाक्षाने संबंधित वापरकर्त्यांच्या निदर्शनास आणावी.

८.३ गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवर निविदा निश्चित झाल्यानंतर यशस्वी निविदाकारास अटी व शर्तीसह Online Contract पाठविण्यात येत असल्याने यशस्वी पुरवठादारापेक्षा वेगळ्यानी करारनामा करावयाची आवश्यक्ता नाही.

**(९) पुरवठ्यास विलंब झाल्यास करावयाची कार्यवाही :-**

विलंब शुल्काच्या आकारणीबाबत भांडार खरेदी नियमावलीच्या दिनांक १ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयातील **परिशिष्ट-४ (अ)** मध्ये दर्शविल्यानुसार मालाची किंमत रु. २ लाखापेक्षा जास्त नसल्यास प्रती हप्ता विलंबास ½ टक्के विलंब शुल्क व कमाल मर्यादा १० टक्क्यांच्या मर्यादेत विलंब शुल्काची आकारणी करण्याची तरतूद आहे. तसेच मालाची किंमत रु. २ लाखापेक्षा जास्त असल्यास प्रती हप्ता विलंबास ½ टक्के विलंब शुल्क व कमाल मर्यादा ५ टक्क्यांच्या मर्यादेत विलंब शुल्काची आकारणी करण्याची तरतूद आहे. पुरवठयास विलंब झाल्यास सदर तरतूदीनुसार पुरवठादाराच्या देयकातून विलंब शुल्क वसूल करण्यात येईल.

**(१०) Online Contract मधील तरतूदीसंदर्भात वाद विवाद व अपिल:-**

Online Contract मधील अटी व शर्ती संदर्भात तसेच दंड, वसूली इ. संदर्भात पुरवठादार, निर्णय दिल्याच्या दिनांकापासून ३० दिवसात पुरवठादार शासनाकडे कडे दाद मागू शकेल. शासनाने दिलेला निर्णय अंतिम राहील आणि तो दोन्ही पक्षांना बंधनकारक राहील. पुरवठादार Online Contract संपल्यानंतर जास्तीत जास्त ६ महिन्यात करारनाम्यातील तरतूदीसंदर्भात दाद मागू शकेल.

**(११)** पोती शिवणयंत्र चालविण्यासाठी २T किंवा SEA१० या प्रकारचे वंगण तेल लागणार असून सदरचे तेल हे आवश्यकतेनुसार जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी संबंधित लेखा शिर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या निधीतून खरेदी करावे.

**(१२)** सदर शिवणयंत्र खरेदीच्या अनुषंगाने येणारा खर्च हा अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या वित्तीय सल्लागार व उप सचिव, महाराष्ट्र शासन यांचे वैयक्तिक ठेव लेख्यामधून मागणी क्रमांक एम-४, "४४०८ अन्न साठवणूक व वखार साठवणूक व वखार साठवण यावरील भांडवली खर्च, मुख्य लेखाशिर्ष (०२)(१०) राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेखालील मुंबई शहर अन्नधान्य खरेदीवरील अनुषंगिक खर्च (अनिवार्य), ४४०८ ०३२६, या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच पोती शिवणयंत्रांच्या वार्षीक देखभाल दुरूस्तीसाठी येणारा खर्च त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**(१३)** सदर शासन निर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या शासन निर्णय क्र.रवका-१०९८/ ५६७/प्र.क्र.२३३८/नापु-१२, दि.३० नोव्हेंबर, १९९८, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-२, उपविभाग-४, अ.क्र.१५ व २७ प्रमाणे प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

**(१४)** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०२०३१६१००३५४०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhir Deodatta Tungar

Digitally signed by Sudhir Deodatta Tungar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b555e4e3006da7480655b52484794686f18de73c0aa909267b188c86a755c75, pseudonym=5E1F07FF6933630D1833271F4B68D3392A0A1127, serialNumber=204E151470E2D21694C51F66F9B5A8FAAE544D15F6BFA485133501059 1835680, cn=Sudhir Deodatta Tungar
Date: 2022.02.03 16:10:38 +05'30'

**(सुधीर तुंगार)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
२) मा.राज्य मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व विभागीय आयुक्त,
७) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
८) संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई
९) सर्व उपायुक्त (पुरवठा), विभागीय आयुक्त, कार्यालय
१०) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)
११) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
१२) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
१३) उप संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
१४) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१५) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
१७) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परीक्षा परिमंडळ द्वारा: वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
२०) वित्त विभाग ( व्यय १०), मंत्रालय, मुंबई.
२१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.
२२) निवड नस्ती/नापु-१६अ.

(अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक : सामुग्री-३१२१/प्र.क्र.१३१/ ना.पु.१६अ, दिनांक : ०३ फेब्रुवारी, २०२२ सोबतचे सहपत्र)

## परिशिष्ट-अ

संबंधित क्षेत्रीय कार्यालये व त्यांना पुरवठा करावयाची पोती शिवण यंत्रे (सुट्या भागाचा संच व एक वर्षाच्या हमीसह) व हँगीग हुक चा पुरवठा दर्शविणारे विवरण पत्र

### पोती शिलाईयंत्रे मागणी

### विवरणपत्र-अ

| अ.क्र. | क्षेत्रीय कार्यालयाचे नाव | पुरवावयाच्या पोती शिवणयंत्रांची संख्या सुट्या भागाचा संच व हँगीग हुकसह |
|---|---|---|
| १ | जिल्हा पुरवठा अधिकारी, रायगड | २१ |
| २ | जिल्हा पुरवठा अधिकारी, अकोला | ३० |
| ४ | जिल्हा पुरवठा अधिकारी, परभणी | २४ |
| ५ | जिल्हा पुरवठा अधिकारी, अहमदनगर | २८ |
| ७ | जिल्हा पुरवठा अधिकारी,जळगांव | ४७ |
| ८ | जिल्हा पुरवठा अधिकारी,अमरावती | ३१ |
| ९ | जिल्हा पुरवठा अधिकारी,गडचिरोली | ४४ |
| १० | जिल्हा पुरवठा अधिकारी पुणे ग्रामीण | २३ |
| ११ | जिल्हा पुरवठा अधिकारी,कोल्हापूर | ३० |
| १२ | जिल्हा पुरवठा अधिकारी, यवतमाळ | ४८ |
| १३ | जिल्हा पुरवठा अधिकारी, लातूर | २३ |
| १४ | जिल्हा पुरवठा अधिकारी, ठाणे | १५ |
| १५ | जिल्हा पुरवठा अधिकारी,वर्धा | ३३ |
| १६ | जिल्हा पुरवठा अधिकारी,औरंगाबाद | १४ |
| १७ | जिल्हा पुरवठा अधिकारी,उस्मानाबाद | १४ |
| १८ | जिल्हा पुरवठा अधिकारी,नाशिक | २० |
| **एकूण** | | **४४५** |

(अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक : सामुग्री-३१२१/प्र.क्र.१३१/ ना.पु.१६अ, दिनांक : ०३ फेब्रुवारी, २०२२ सोबतचे सहपत्र)

(पोती शिवणयंत्रे (Bag Closer Machines), त्याच्या सुट्याभागांचा संच (Spare Parts)(यादी व संख्या), हँगींग हुक (Hanging Hook) च्या मानकांचे विवरणपत्र)

# परिशिष्ट- ब

**(१) शिवणयंत्रांसाठीची मानके (specifications of bag closing machine) व आवश्यक सुट्या भागाची यादी व संख्या:**

- Sewing Speed: Minimum 1600-1800 stiches per minute (5-8 bags per minute)
  - ✓ Stich Length: 6-8 mm
  - ✓ Single needle, single thread chain stitch sewing machine.
- Operating Materials:
  - ✓ Must sew 15 mm and thicker materials (Specially Jute Bags, burlap, cotton, PP/PE, woven polyester, Jute Bags etc.).
  - ✓ All stiches must be tight, leak free (grains), uniformly spaced, no skip stitching and no unusual thread breaking.
- Power Requirements: 220V, single phase. AC/DC Motor of min. 1/10 HP
- Net weight of machines: not more than 7.0 kg.
- Dust proof sealed cover on machine. It is expected that machine must be sturdy and suitable for continuous operation without overheating. It is expected that parts of machine must be manufactured from wear resistance material. Common sewing machine parts such as bush needle bar, bush pressure bar, needle plate/throat plate, pressure bar, bushing looper shaft, looper, main shaft, etc. must be manufactured from mild steel or other high grade material with good hardness value.
- Holding handle of suitable material for firm grip and comfort while operating machine.
- Oil/greasing holes for lubrication of moving functional parts and to prevent wear of parts.
- In addition to standard spare parts and accessories, following items (with stated quantities) must be supplied with each machine. The unit price of each item must be clearly and separately stated with the quoted machine price:

| Spare part item | Required quantities to be supplied with each |
|---|---|
| a. Motor carbon with | 12 pieces |
| b. Throat plates | 2 pieces |

| | |
|---|---|
| c. Needle lock nuts | 6 pieces |
| d. Needle bar with २ | 1 piece |
| e. Motor carbon holder cap | 5 pieces |
| f. Belts | 4 pieces |
| g. Needles | 20 Pieces |
| h. Looper | 8 pieces |

- Maintenance and Service Conditions: Warranty of minimum 90 days for any manufacturing defect. All details such as annual maintenance cost, parts covered under warranty period and other terms of contract must be clearly mentioned.
- One year maintenance should be provided.

- Availability of spare parts and expertise for repair/maintenance at local/taluka level.
- Operating threads: Cotton and synthetic threads in the range of 500-1400 Twin Denier.

- Mechanical type of cutter to cut threads after closure of bags.

- Machine surface must be smooth and free from defects. Paint shall not be peeled easily from machine surface. No signs of overheating, breakage and manufacturing defects should be observed after continuous usage of machine (as per BIS standards). Machine should run smoothly without any abnormal/fatigues sound.
- Maximum dimensions of machine : 22” x 18” x 18”
- Standard accessories (Minimum these many parts must be supplied as a standard accessories):

  १. Accessories box, 2. Allen keys, 3. Needles (minimum 3 needles), 4. Wrench, 5. Screw driver, 6. Oil can, 7. Looper

(२) **हँगींग हुकची मानके (Specifications of Spring loaded Suspention unit (Hook)) :**

Suspension units are required to hold portable bag closure machines. The brief characteristics of suspension units are as follows:

- Must hold portable bag closure machines of minimum 7 kg weight. There must be two hooks with a locking system; one hook to hang the unit on bar and other hook to hold a portable bag closure machine at the end of rope of suspension unit
- Suspension unit must have a metallic rope of minimum 5 mm diameter and a length more than 4 feet.
- Rope must be spring loaded with a self re-winding arrangement with a provision to control rope length.

(अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक : सामुग्री-३११९/प्र.क्र.९०/ ना.पु.१६अ,

दिनांक : ०३ फेब्रुवारी, २०२२ सोबतचे सहपत्र)

# परिशिष्ट- क

TO WHOM IT MAY CONCERN

ON the basis of examination of the books of account and other relevant records of i.e.M/s.------------------------------- We hereby certify that the turnover the company / Distributor for the last three financial years are as follows :

| **Period** | **Rs. in Laks** |
|---|---|
| 2018-19 | |
| 2019-20 | |
| 2020-21 | |
| **Total** | |

(Name and Signature of Chartered Accountant)

(अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक : सामुग्री- सामुग्री-३१२१/प्र.क्र.१३१/ ना.पु.१६ अ
दिनांक : ०३ फेब्रुवारी, २०२२ सोबतचे सहपत्र)

# परिशिष्ट- ड

(शासन निर्णयातील परिच्छेद ६.७ नुसार द्यावयाचे प्रमाणपत्र)

**प्रति,**

वित्तीय सल्लागार व उप सचिव,
वि.स. व उ.स. कार्यालय, गो.ते.रूग्णालय परिसर,
नवीन मंत्रालय, इमारत, ८ वा मजला, लो.टि. मार्ग,
मुंबई- ४०० ००१

विषय :- शिवणयंत्रे, सुटे भाग व हँगींग हुक जिल्ह्यासाठी प्राप्त झाल्याबाबतचे प्रमाणपत्र देणेबाबत.
संदर्भ :- शासन निर्णय क्र. सामुग्री-३१२१/प्र.क्र. १३१ /ना.पु.१६अ
दिनांक : जानेवारी, २०२२

महोदय,

प्रमाणित करण्यात येते की, मेसर्स -------------------------------- यांचेकडून या कार्यालयास दिनांक ------ रोजी ------ इतकी पोती शिवण यंत्रे (इतर आवश्यक साहित्यासह), सुट्या भागांचा संच, हँगींग हुक सुस्थितीत प्राप्त झाले असून नोंद घेण्याची दक्षता घेण्यात येत आहे. ही शिवणयंत्रे वापरण्याचे पूर्ण प्रशिक्षण प्रात्यक्षिकासह देण्यात आलेले आहे. शिवणयंत्रामध्ये वारंवार होणाऱ्या दोषांची माहिती व आवश्यक सुटे भाग बदलण्याचे प्रशिक्षण देखील पुरवठादाराकडून देण्यात आलेले आहे. करीता प्रमाणपत्र देण्यात येत आहे.

दिनांक

स्वाक्षरी/-
जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी

गोल शिक्का